# **महाराष्ट्र शासन**

क्रमांक : गौखनि -३२/१२१९/प्र.क्र१४७/ख-१

महसूल व वन विभाग
हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : २४/०८/२०२०.

**विषय : गौण खनिज-जळगांव**
मौजे धानोरा बु. ता. जळगांव व टाकरखेडा व वैजनाथ, ता. एरंडोल या तीन एकत्रीत गट क्र.२ (अ) या वाळूगटाची इसारा तसेच व्याजाची रक्कम परत करण्याबाबत.
-श्री. कैलास नारायण सोनवणे.

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी जळगांव यांना त्यांचे पत्र क्र./गौणख/ई-कावि/२०१९/८/२६/२०२३, दि.२०/१२/२०१९ च्या उपरोक्त विषयावरील पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २००६-०७ करीता जळगांव जिल्ह्यातील मौजे धानोरा बु. ता. जळगांव व टाकरखेडा व वैजनाथ, ता. एरंडोल या तीन एकत्रीत गट क्र.२ (अ) च्या वाळू साठ्याकरीता ५ बोलीधारकांनी इसारा रक्कम भरून लिलावात भाग घेतला. सदर वाळूटाचे प्रथम व द्वितीय बोलधारक यांनी लिलाव घेण्यास असमर्थता दर्शविल्याने जिल्हाधिकारी जळगांव यांनी सदर वाळूगटाचे तृतीय लिलावधारक श्री. कैलास नारायण सोनवणे यांना स्विकृतीपत्र पाठविले. परंतु त्यांनी दि.२५/०८/२००६ रोजीच्या पत्रान्वये इसारा रक्कम परत मिळण्यास विनंती केली होती.

तद्नंतर जिल्हाधिकारी जळगांव यांनी विभागीय आयुक्त नाशिक यांना सदर वाळूगटाचा फेरलिलाव करण्यास मान्यता मिळणेबाबत विनंती करण्यात आली. त्याअनुषंगाने विभागीय आयुक्त, नाशिक यांनी दि.१३/११/२००६ रोजीच्या आदेशान्वये बोलीधारक यांनी जमा केलेली इसारा रक्कम शासनजमा करणेबाबतचे आदेश पारीत केले. त्यानुसार जिल्हाधिकारी जळगांव यांनी दि.२६/०२/२००७ रोजीच्या आदेशान्वये कळविल्यानुसार तहसिलदार जळगांव यांनी दि.०६/०३/२००७ रोजी श्री. सोनवणे यांची इसारा रक्कम रू. २,५०,०००/- शासनजमा केली. सदर आदेशाविरूध्द श्री. सोनवणे यांनी मा. दिवाणी न्यायालय, जळगांव यांच्याकडे दाखल केलेल्या रे.मु.नं.१७३/२००७ दाव्यामध्ये मा. दिवाणी न्यायालयाने दि.१८/०१/२०१२ रोजीच्या आदेशान्वये जप्त केलेली रक्कम रू.२,५०,०००/- व त्यावर ६% वार्षिक दराने व्याजाची रक्कम परत करण्याचे आदेश पारीत केले. सदर आदेशाच्या विरूध्द जिल्हाधिकारी जळगांव यांनी मा. जिल्हा न्यायालय, जळगांव येथे दाखल केलल्या अपिल क्र.१७३/२०१३ मध्ये मा. जिल्हा न्यायालय, जळगांव यांनी दि.११/०९/२०१९ रोजी रक्कम रू.२,५०,०००/- व दि.०३/०८/२००७ पासून रक्कम अदा करेपर्यंत ६% वार्षिक दराने व्याजाची रक्कम परत करण्याचे आदेश पारीत केले. सबब, श्री. सोनवणे यांना शासनजमा केलेली इसारा रक्कम रू.२,५०,०००/- तसेच दि.०३/०८/२००७ ते दि.०३/०८/२०२० या कालावधीसाठी व्याजाची रक्कम रू.१,९५,०००/- अदा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. सबब, लिलावधारक श्री. कैलास नारायण सोनवणे यांना रु. २,५०,०००/- (अक्षरी **रुपये दोन लक्ष पन्नास हजार फक्त**) व व्याजाची रक्कम रू.१,९५,०००/- **(एक लक्ष पंच्याण्णव हजार फक्त)** इतकी रक्कम, त्यांना यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. याबाबीवर इसारा रक्कम रू.२,५०,०००/- इतका होणारा खर्च "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व

धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६)" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

तसेच, व्याजाची रक्कम रू.१,९५,०००/- इतका होणारा खर्च सन २०२०-२१ या वर्षाकरीता "मागणी क्र. सी-१," "२०५३ जिल्हा प्रशासन" ०९३-जिल्हा आस्थापना, (०१) - सर्वसाधारण आस्थापना, (०१)(०३) आयुक्त नाशिक (अनिवार्य), (२०५३ ००४६) या लेखाशिर्षाखाली, १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

४. सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००८२४१६०५४७५०१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, serialNumber=8c2377ed235498603821d49922a210871ff6fb9b369722ac707aee7dcd87f2bd, cn=Dinesh Rohidas Chavan
Date: 2020.08.24 16:11:31 +05'30'

**( दि. रो. चव्हाण )**
अवर सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति,**

विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक
जिल्हाधिकारी जळगांव, जळगांव.

**प्रत:**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई - ४०० ०२०.
२) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई -४०० ०२०.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव.
४) वित्त विभाग, (व्यय-९, अर्थसंकल्प -३, ६ व १४ कार्यासने) हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.
५) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.
६) निवडनस्ती ख कार्यासन, महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.